**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.:- आस्था-२०१६/प्र.क्र.१४५/फ-१२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३१ मार्च, २०१७.

**संदर्भ:-** शासन निर्णय, क्र : आस्था-२०१६/प्र.क्र.१६/फ-१२, दि.३० मार्च, २०१७.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय व राज्य वन निती मधील मुख्य उद्दिष्टानुसार एकूण भौगोलिक क्षेत्राच्या ३३% क्षेत्रावर वन /वृक्ष आच्छादन असणे आवश्यक आहे. सद्य:स्थितीत महाराष्ट्रामध्ये एकूण भौगोलिक क्षेत्राच्या सुमारे २० % वन क्षेत्र आहे. सदर वनक्षेत्र ३३ टक्के पर्यंत नेण्याचे उद्दीष्ट आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे राज्य शासनाने वनेत्तर क्षेत्रावर वृक्ष लागवडीच्या माध्यमातून वनीकरण करणेचा कार्यक्रम मोठ्या प्रमाणावर राबविण्याचे ठरवले. राष्ट्रीय कृषि आयोगाचे संकल्पनेतून व तत्कालीन परिस्थितीचा परामर्श घेवून महाराष्ट्र शासनाने सन १९८१ मध्ये सामाजिक वनीकरण व फलोत्पादन असा नवीन विभाग निर्माण केला व त्याचे अंतर्गत सन १९८२ मध्ये सामाजिक वनीकरण संचालनालय स्थापन केले.

२. तथापि, शासन स्तरावर संचालनालयाचे नियंत्रण हे कायम स्वरुपी एका मंत्रालयीन विभागाकडून न होता आजपर्यंत विविध विभागाकडून खालीलप्रमाणे झाले आहे.

| अ.क्र. | कालावधी | विभाग |
|---|---|---|
| १. | सन १९८२ ते १९८७ | सामाजिक वनीकरण व फलोत्पादन विभाग |
| २. | सन१९८८ ते १९९२ | महसूल व वन विभाग |
| ३. | सन १९९२ ते डिसेंबर, २०१४ | ग्रामविकास व जलसंधारण विभाग |
| ४. | जानेवारी, २०१५ पासून | महसूल व वन विभाग |

३. ग्रामविकास व जलसंधारण विभागांतर्गत सामाजिक वनीकरण विभाग वर नमूद केल्याप्रमाणे कार्यरत होता. त्या कालावधीमध्ये सामाजिक वनीकरण विभागास देण्यात आलेल्या जबाबदाऱ्या विचारात घेता या विभागाचे कामकाज अधिक बळकट कसे करता येईल व त्याचा राज्यातील वृक्ष आवरण आणि वृक्षाच्छादन वाढविण्यासाठी अधिक उत्तमरितीने कसा उपयोग करून घेता येईल? या संदर्भात सेवा निवृत्त मुख्य सचिव श्री. अरूण बोंगीरवार यांच्या अध्यक्षतेखाली दि.५ सप्टेंबर, २०१२ रोजीच्या ग्रामविकास व जलसंधारण विभागाच्या शासन निणयान्वये अभ्यास समिती नेमण्यात आली होती. सदर समितीने अहवाल दि.३१ डिसेंबर, २०१३ रोजी शासनास सादर केला. यामध्ये सामाजिक वनीकरण विभागाचे बळकटीकरणाबरोबरच सदर विभाग वन विभागास जोडण्याबाबत मुख्यत्वेकरून शिफारशी केल्या.

४. महाराष्ट्र शासनाने राष्ट्रीय वन निती १९८८ व राज्य वन धोरण २००८ मध्ये दिलेल्या उद्देशाची पुर्तता अधिक सुकर आणि फलद्रुप होणेचे दृष्टीने शासन निर्णय दिनांक ४/१२/२०१४ अन्वये सामाजिक वनीकरण

विभागाचे १ जानेवारी, २०१५ पासून वन विभागामध्ये समावेशन करण्यात आले आहे. तथापि, सदर विलनीकरणाचा उद्देश सफल होणेचे दृष्टीने तसेच वन विभाग व सामाजिक वनीकरण यांचे सक्षमपणे बळकटीकरण व्हावे या दृष्टीने सामाजिक वनीकरण आणि वन विभाग ह्यांचे एकत्रिकरण कसे व्हावे, हे सुचविण्यासाठी शासनाने ५ जानेवारी, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रधान मुख्य वनसरंक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे अध्यक्षतेखाली समितीचे गठन केले होते.

५. सदर समितीने केलेल्या शिफारशींचे अवलोकन केले असता वन आणि सामाजिक वनीकरण विभागाच्या संरचनेमध्ये मुलभूत बदल सुचविले आहेत. तसेच सध्याची काही कार्यालये बंद करून नव्याने कार्यालये स्थापन करण्याबाबत सुचविले आहे. त्यामुळे वन आणि सामाजिक वनीकरण विभागाच्या कामकाजामध्ये दूरगामी (Drastic) बदल संभवतात.

६. त्याचबरोबर वनरक्षक /रोपवन कोतवाल या संवर्गात ८००० पदे निर्माण करण्याबाबत समितीने प्रस्तावित केले आहे. त्यावर अंदाजे रुपये १९२ कोटी वार्षिक खर्च अपेक्षित आहे. सध्य:स्थितीत नवीन पद निर्मितीवर बंदी असल्याने हा प्रस्ताव स्वतंत्ररित्या सादर करुन शासनाची मान्यता घ्यावी लागेल. त्यात काही कालावधी जाईल. तोपर्यंत उपलब्ध आस्थापनेमार्फत अधिक वेगाने कामे करुन घेण्याशिवाय पर्याय दिसत नाही. तसेच एकंदरीतच दोन्ही विभागांची कामे प्रभावित न होता सुरळीतपणे पुढे सुरू राहणे आवश्यक आहे.

७. तसेच सामाजिक वनीकरण विभागाने वनेतर (Non Forest) विशेषत: खाजगी, पडीक आणि शासकीय मालकीच्या जागांवर वृक्ष लागवड करून वृक्ष आवरण आणि वृक्षाच्छादन वाढविणे अपेक्षित आहे. पुढील कालावधीमध्ये वनक्षेत्रावर वृक्षारोपण करण्यास मर्यादा आहेत. त्यामुळे वनक्षेत्रामध्ये फार वाढ होणे शक्य नाही. सबब, वन विभागांतर्गत प्रादेशिक कार्यालयांतर्गत अधिकारी व कर्मचारी यांना सामाजिक वनीकरण विभागांतर्गत वृक्षाच्छादन वाढविण्यासंदर्भातील उत्तरदायित्व आणि जबाबदारीची जाणीव (Ownership of the programme) झाल्यास हे सर्व कामकाज अधिक गतीने पुढे नेणे सोपे जाईल. त्यासाठी प्रादेशिक विभागातील आणि सामाजिक वनीकरण विभागातील कर्मचारी आणि अधिकारी आणि यंत्रणा यांनी पुढील काही वर्षात संयुक्तपणे एकजिनसीपणाने काम करून वन आणि वनेत्तर (Forest and Non Forest Area) क्षेत्रामध्ये वनीकरणाचा व्यापक आणि भरीव कार्यक्रम राबविल्यास त्याचा मोठा लाभ होऊ शकेल.

८. थोडक्यात प्रादेशिक वन वृत्तातील कर्मचारी आणि अधिकाऱ्यांना त्यातून राज्यातील वनक्षेत्र आणि वृक्षाच्छादन ३३ टक्के पर्यंत नेण्याच्या दृष्टीने मोठी मजल गाठणे शक्य होणार आहे.

९. त्याचबरोबर सध्या वन आणि सामाजिक वनीकरण या विषयीची माहिती कोणत्या कार्यालयाकडे उपलब्ध असते, याबाबत लोकांमध्ये संभ्रम निर्माण होतो. वरीलप्रमाणे सामाजिक वनीकरण आणि वन विभाग यांचे एकत्रिकरण झाल्यास लोकांना एकाच ठिकाणी सर्व माहिती उपलब्ध होण्यास मदत होऊ शकेल. त्यातून जनसामान्यांची विभागाविषयीची प्रतिमा सातत्याने उच्चतम राखण्यास हातभार लागेल. त्याचबरोबर एक खिडकी योजनेप्रमाणे लोकांना एकाच ठिकाणी माहिती मिळाल्यास ती लोकांच्या दृष्टीने अधिक सुसह्य राहील. त्या अनुषंगाने सामाजिक वनीकरण विभाग आणि वन विभाग यांचे एकत्रिकरण (Integration) करण्यासंदर्भातील प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

१०. संदर्भाधीन शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे सामाजिक वनीकरणांतर्गत कर्मचारी/अधिकारी यांचे नामाभिधान खालीलप्रमाणे राहणार आहे:-

| अ.क्र. | सामाजिक वनीकरण विभागातील कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांचे सध्याचे पदनाम | नवीन पदनाम |
|---|---|---|
| १. | उपसंचालक | विभागीय वन अधिकारी (सामाजिक वनीकरण) |
| २. | सहायक संचालक | सहायक वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) |
| ३. | लागवड अधिकारी | वनक्षेत्रपाल (सामाजिक वनीकरण) |
| ४. | सहायक लागवड अधिकारी | वनपाल (सामाजिक वनीकरण) |
| ५. | लागवड/रोपवन कोतवाल | वनरक्षक (सामाजिक वनीकरण) |

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबी विचारात घेवून सामाजिक वनीकरण विभाग आणि वन विभाग यांचे एकत्रिकरणाबाबत (Integration) प्रथम टप्प्यात पुढीलप्रमाणे शासन मान्यता देण्यात येत आहे:-

**१.१ राज्यस्तरावरील एकत्रिकरण:-** राज्यस्तरावर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे प्रमुख असतील तर त्यांच्या अधिनस्त प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे हे काम पाहतील. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या समितीने सुचविल्याप्रमाणे प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे हे कार्यालय प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य नागपूर यांच्या अधिपत्याखाली कार्यरत राहील. तसेच सामाजिक वनीकरणांतर्गत सध्या सुरु असलेल्या योजना व कार्यक्रम यांची अंमलबजावणी, अर्थसंकल्प विषयक बाबी या संदर्भातील समन्वय आणि सनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे यांच्याकडून सध्याच्या कार्यपध्दतीप्रमाणे पुढे सुरु राहील. याबाबत संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) व त्यांच्या कार्यालयास जोडले जाणारे वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण यांच्यामार्फत ही कामे संनियंत्रित केली जातील. त्याचबरोबर सामाजिक वनीकरण विभागाशी संबंधित संपूर्ण धोरणात्मक बाबीं विषयीचे प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे हे प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत शासनास सादर करतील.

**१.२ वृत्तस्तरावरील एकत्रिकरण :-** वृत्तस्तरावर मुख्य वनसंरक्षक (प्रा.) हे प्रमुख असतील व त्यांच्या अधिनस्त वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) हे काम पाहतील. सध्या वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण याकरिता राज्यामध्ये ६ वृत्त (Circle) आहेत. त्याचबरोबर प्रादेशिक स्तरावरील ११ वनवृत्त (Territorial circles) आहेत. वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण वृत्त कार्यालय हे महसूल विभागीय ठिकाणच्या मुख्य वनसंरक्षक (प्रा.) यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली आणण्यात येत आहे.

**१.३** ज्या सामाजिक वनवृत्तात एकापेक्षा जास्त प्रादेशिक वनवृत्ताचे क्षेत्र समाविष्ट आहे, तेथील महसूल विभागीय ठिकाणी नसणाऱ्या प्रादेशिक वनवृत्ताच्या बाबतीत सामाजिक वनीकरणाची सर्व कर्तव्य, जबाबदाऱ्या आणि कामे संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रा.) हे पाहतील. त्यांच्या कार्यालयात वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण हे पद

असणार नाही. उदा. पुणे सामाजिक वनवृत्तात मुख्य वनसंरक्षक (प्रा.), पुणे आणि मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर वनवृत्ताचे क्षेत्र समाविष्ट आहे. वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे हे कार्यालय, मुख्य वनसंरक्षक (प्रा.), पुणे यांच्या अधिपत्याखाली राहील व त्यांच्याकडे पुणे आणि सोलापूर ह्या जिल्ह्यातील सामाजिक वनीकरणाशी संबंधित कामे केली जातील. उर्वरित सातारा, सांगली, कोल्हापूर, तसेच कोल्हापूर प्रादेशिक वृत्तातील सिंधुदुर्ग आणि रत्नागिरी या जिल्ह्यातील सामाजिक वनीकरण विभागाशी संबंधित कामे मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर यांच्या संपूर्ण नियंत्रणाखाली पाहिली जातील.

त्या अनुषंगाने सामाजिक वनीकरण वृत्त आणि प्रादेशिक वन वृत्त यांचे एकत्रिकरण सोबत जोडलेल्या **परिशिष्ट-अ** प्रमाणे राहील:-

१.४ वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यासाठी संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रा.) हे प्रतिवेदन अधिकारी (Reporting officer) म्हणून राहतील. तसेच वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, यांच्या गोपनीय अहवालाचे पुनर्विलोकन (Review officer) संबंधित पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक हे करतील. तसेच स्वीकृत अधिकारी (Accepting Authority) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे हे राहतील.

**१.५ जिल्हा स्तरावरील उपसंचालक, सामाजिक वनीकरण [नवीन पदनाम:-विभागीय वन अधिकारी (सामाजिक वनीकरण)] यांचे नियंत्रक अधिकारी:-**

सध्या अस्तित्वातील उप संचालक, सामाजिक वनीकरण (विभागीय वन अधिकारी-सामाजिक वनीकरण) ही कार्यालये संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रा.) यांच्या थेट नियंत्रणाखाली राहतील. या शासन निर्णयासोबतच्या **परिशिष्ट-ब** प्रमाणे संबंधित कार्यालयांचे नियंत्रण मुख्य वनसंरक्षक (प्रा.) यांच्याकडे राहील. याशिवाय विभागीय वन अधिकारी (सामाजिक वनीकरण) हे संपूर्ण जिल्ह्यासाठी प्रसिध्दी, प्रचार, जाहिरात व जनजागृतीची कामे वनरक्षक, सामाजिक वनीकरण/मुख्य वनसरंक्षक (प्रा.) यांच्या मार्गदर्शनानुसार व आर्थिक तरतुदीनुसार व शासकीय धोरणानुसार राबवितील.

**१.६** विभागीय वन अधिकारी (सामाजिक वनीकरण) यांचे गोपनीय अहवाल ते ज्या मुख्य वनसंरक्षक (प्रा), यांच्या थेट नियंत्रणाखाली आहेत ते लिहितील. तथापि, गोपनीय अहवाल लिहिताना ज्या कार्यालयात वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) कार्यरत आहेत, त्यांचा अहवाल घेऊन संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रा) हे प्रतिवेदन करतील. त्या संदर्भात पुनर्विलोकन अधिकारी म्हणून पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक हे राहतील. ज्या ठिकाणी वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) हे पद नसेल त्या ठिकाणी विभागीय वन अधिकारी (सामाजिक वनीकरण) यांचे गोपनीय अहवाल मुख्य वनसंरक्षक (प्रा.) हे थेट लिहितील. तसेच, पुनर्विलोकन अधिकारी म्हणून संबंधित पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक हे असतील.

१.७ सहायक संचालक, सामाजिक वनीकरण यांचे नवीन पदनाम सहायक वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) असे राहील. सहायक वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) यांचे गोपनीय अहवाल हे संबंधित विभागीय वन अधिकारी (सामाजिक वनीकरण) हे लिहितील. ज्या कार्यालयात वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) कार्यरत आहेत, त्यांचा अहवाल घेऊन संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रा) हे प्रतिवेदन करतील. ज्या ठिकाणी वनसंरक्षक

(सामाजिक वनीकरण) हे पद नसेल त्या ठिकाणी सहायक वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) यांचे गोपनीय अहवाल मुख्य वनसंरक्षक (प्रा.) हे थेट पुनर्विलोकीत करतील.

१.८ लागवड अधिकारी, सहायक लागवड अधिकारी आणि लागवड कोतवाल यांचे नव्याने नामाभिधान अनुक्रमे वनक्षेत्रपाल (सामाजिक वनीकरण), वनपाल (सामाजिक वनीकरण) आणि वनरक्षक (सामाजिक वनीकरण) असे राहील. सदर तांत्रिक अधिकाऱ्यांचे आणि अनुषंगिक अतांत्रिक संवर्गातील कर्मचाऱ्यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यासंदर्भात सध्याची कार्यपध्दती पुढे सुरु राहील.

१.९ वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) ही कार्यालये भाड्याच्या किंवा शासकीय जागांमध्ये आहेत. अशा कार्यालयांना जर मुख्य वनसंरक्षक (प्रा), यांच्या कार्यालयात जागा उपलब्ध असल्यास, त्या ठिकाणी ही कार्यालये त्वरित स्थलांतरित करण्यात यावीत. जर जागा उपलब्ध नसेल तर तूर्त सध्या ही कार्यालये जेथे आहेत, तेथूनच ते अधिकारी आपले कामकाज पाहतील. तथापि, शक्यतो लवकरच सदर कार्यालये मुख्य वनसंरक्षक (प्रा.) कार्यालयात स्थलांतरित करण्याची कार्यवाही करावी.

१.१० उपरोक्त प्रमाणे वन व सामाजिक वनीकरण विभागाचे एकत्रिकरण झाल्यानंतर अर्थसंकल्प विषयक बाबी आणि आहरण व वितरण अधिकारी याबाबत सामाजिक वनीकरण विभागाच्या वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, उपसंचालक, सामाजिक वनीकरण (विभागीय वन अधिकारी-सामाजिक वनीकरण) आणि लागवड अधिकारी (वनक्षेत्रपाल-सामाजिक वनीकरण) ह्या अधिकाऱ्यांना असलेले अधिकार सध्याच्या कार्यपध्दतीप्रमाणे यापुढे देखील तसेच सुरु राहतील.

१.११ सामाजिक वनीकरण आणि वन विभागांतर्गत कार्यक्रम व योजना यांची परिणामकारकरित्या आणि कार्यक्षमतेने अंमलबजावणी करण्यासाठी प्रादेशिक आणि सामाजिक वनीकरण यांच्याकडील जबाबदाऱ्यांविषयी अंतर्गत बदलाबाबत, कोणतीही पदे कमी किंवा जास्त न करता कार्यान्वित करण्याचे अधिकार प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), नागपूर यांच्या पूर्व मान्यतेने संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) यांना राहतील.

२. उपरोक्त नमूद प्रस्तावाप्रमाणे सामाजिक वनीकरण आणि प्रादेशिक वनवृत्त यांचे एकत्रिकरण झाल्यानंतर त्यापासून खालील लाभ अपेक्षित आहेत:-

२.१ सामाजिक वनीकरण क्षेत्रामध्ये वृक्षारोपण आणि संगोपन या विषयक कामे करतांना त्या संदर्भातील उत्तरदायित्व आणि जबाबदारी (Sense of ownership and responsibility) या विषयी प्रादेशिक वनवृत्त स्तरावरील अधिकारी/कर्मचारी यांचेमध्ये जाणीव निर्माण होईल.

२.२ प्रादेशिक वनवृत्त आणि सामाजिक वनीकरण या विभागातील अधिकारी/कर्मचारी यांनी एकत्रितरित्या आत्मियतेने काम केल्यास जास्त मनुष्यबळ वृक्षलागवड आणि संगोपन कार्यक्रमास उपलब्ध होईल. त्यातून या कार्यक्रमाची जलद गतीने, गुणवत्तापूर्वक आणि कार्यक्षमतेने अंमलबजावणी करण्यास मदत होईल. त्यामुळे सामाजिक वनीकरणाकडे असलेल्या तुटपुंज्या आस्थापनेस अधिक बळकटी मिळून या पुढील वृक्षरोपणाचा आणि संगोपनाचा धडक आणि महत्वाकांक्षी कार्यक्रम वेगाने सुरु ठेवण्यास भरीव मदत होईल.

२.३ पुढील तीन वर्षामध्ये ५० कोटी वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट ठरविण्यात आले असून, त्या संदर्भात सविस्तर मार्गदर्शक सूचना आणि निकष दिनांक १० ऑक्टोबर, २०१६ रोजीचे शासन निर्णयान्वये ठरविण्यात आले आहेत. या कार्यक्रमासाठी रोपवाटिका विकसित करणे, वृक्ष लागवडीसाठी स्थळ निश्चिती, विविध माध्यमातून मनुष्यबळाची उपलब्धता, प्रत्यक्ष वृक्षारोपण आणि संगोपन व देखभाल यासाठी मोठया प्रमाणात कर्मचारी व अधिकारी यांच्या सेवा गरजेच्या असल्याने त्या काही प्रमाणात उपलब्ध होतील.

२.४ त्याचबरोबर राज्यातील वनक्षेत्र २० टक्केवरुन ३३ टक्केपर्यंत नेण्यासाठी वृक्ष लागवडीच्या राज्यातील ग्रामीण आणि शहरी भागातील पडीक आणि मोकळया जागांव्यतिरिक्त केंद्रशासनांतर्गत रेल्वे, राष्ट्रीय महामार्ग, संरक्षण, मायनींग क्षेत्र आणि केंद्रीय सार्वजनिक बांधकाम विभाग इत्यादि विभागांतर्गत जागांची उपलब्धता करण्यासाठी धडक कार्यक्रम हाती घेण्यास बळकटी प्राप्त होईल.

२.५ वर नमूद केल्याप्रमाणे राज्यामध्ये वृक्ष रोपणासाठी आणि संगोपणासाठी लोकसहभाग मिळून हा कार्यक्रम जनआंदोलन आणि लोकचळवळीमध्ये रुपांतरित करण्यासाठी देखील कर्मचारी आणि अधिकारी यांचा सहभाग महत्वपूर्ण राहणार आहे. त्यामुळे वन आणि सामाजिक वनीकरण विभागाच्या कर्मचा-यांनी एकदिलाने काम करण्यास प्रोत्साहन मिळेल.

२.६ वृक्षारोपण आणि संगोपन कार्यक्रमात सातत्य आणि निरंतरता ठेवून हा कार्यक्रम पुढे सुरु ठेवणे प्रस्तावित आहे. त्यासाठी प्रादेशिक वनवृत्त आणि सामाजिक वनीकरण यांनी एकत्रितरित्या वृक्ष क्रांतीचे शिवधनुष्य पेलल्यास, महाराष्ट्राला हरित राज्याच्या दिशेने नेण्यास प्रचंड फायदा होणे अपेक्षित आहे.

२.७ त्याचप्रमाणे वन विभाग आणि सामाजिक वनीकरण यांचे एकत्रिकरण झाल्यानंतर महाराष्ट्र वृक्षतोड कायदा १९६४ मधील तरतूदीनुसार खाजगी व्यक्ती व शेतकरी यांना झाड तोडण्याची परवानगी आणि वाहतूक पास या संदर्भातील कामे वनक्षेत्रपाल (सामाजिक वनीकरण) आणि त्यांच्या अधिपत्याखालील कर्मचाऱ्यांना देणे संदर्भात विचार करता येईल.

२.८ तसेच प्रसिध्दी विषयक कामे सामाजिक वनीकरण विभागाच्या अधिकाऱ्यांकडे द्यावयाचे असल्याने प्रादेशिक वनवृत्ताच्या कामांबाबत अधिक व्यापक आणि विस्तृत प्रसिध्दी करण्यास प्रादेशिक वनवृत्ताला फायदा होऊ शकेल.

२.९ पुढील ३ वर्षातील ५० कोटी वृक्ष लागवड कार्यक्रमांतर्गत रोपवाटिका निर्मिती, स्थळ निश्चिती, कार्यक्रमाचा सुक्ष्म नियोजन आराखडा तयार करणे इत्यादीबाबत दि.३१ डिसेंबर २०१६ पर्यंत नियोजन करण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. ही प्रक्रिया अधिक गतीमान करण्यासाठी वन आणि समाजिक वनीकरण विभागाचे एकत्रिकरणाचे आदेश दिनांक १ एप्रिल, २०१७ पासून लागू करण्यात येत आहेत.

३. वित्त विभागाच्या दि. २ जून, २०१५ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागांतर्गत आस्थापनेचे अंतर्गत समायोजन करण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत. त्यानुसार वरिष्ठ स्तरावर शासन मान्यता घेवून सदर आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४०११४३५४१७९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.04.01 15:31:09 +05'30'

**( डी.एल.थोरात )**
**सह सचिव (वने)**

**प्रत :-**

१) मा. मुख्य सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव, गृह विभाग ( परिवहन व बंदरे ), मंत्रालय, मुंबई
४) सर्व प्रशासकीय विभागाचे सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वन बल प्रमुख ), महाराष्ट्र राज्य,नागपूर
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, म.रा., पुणे
७) सर्व प्रधान मुख्य वनसंरक्षक , वन विभाग
८) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक , वन विभाग
९) सर्व विभागीय आयुक्त ( महसूल )
१०) सर्व जिल्हाधिकारी
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१२) सर्व पोलिस अधिक्षक/पोलिस आयुक्त
१३) आयुक्त, सर्व महानगरपालिका
१४) सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रा.), वन विभाग
१५) सर्व वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, वन विभाग
१६) सर्व उप वनसंरक्षक, वन विभाग
१७) सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण
१८) सर्व वनक्षेत्रपाल, वन विभाग
१९) सर्व लागवड अधिकारी, सामाजिक वनीकरण
२०) सर्व उपविभागीय अधिकारी (महसूल ), संबंधित तालुका
२१) सर्व तहसीलदार
२२) सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती
२३) सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका
२४) सर्व प्रशासकीय विभागांचे विभाग प्रमुख
२५) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२६) निवडनस्ती/फ-१२.

********

## परिशिष्ट-अ

| अ. क्र. | प्रादेशिक वनवृत्ताचे नाव | प्रादेशिक वनवृत्तामध्ये समावेश करावयाचे सामाजिक वनवृत्त कार्यालय | सामाजिक वनीकरणासाठी समाविष्ट जिल्हा क्षेत्र |
|---|---|---|---|
| १. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे. | वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, ठाणे. | मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, रायगड आणि पालघर. |
| २. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), पुणे. | वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे. | पुणे आणि सोलापूर. |
| ३. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर. | - | सातारा, सांगली, कोल्हापूर, सिंधुदुर्ग आणि रत्नागिरी. |
| ४. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नाशिक. | वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, नाशिक. | नाशिक आणि अहमदनगर. |
| ५. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), धुळे. | - | धुळे, नंदुरबार आणि जळगाव. |
| ६. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), औरंगाबाद. | वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, औरंगाबाद. | ओरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, नांदेड, लातूर, उस्मानाबाद, आणि बीड. |
| ७. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), अमरावती. | वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, अमरावती. | अमरावती आणि बुलढाणा. |
| ८. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), यवतमाळ. | - | यवतमाळ, अकोला आणि वाशिम. |
| ९. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर. | वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, नागपूर. | नागपूर, वर्धा, भंडारा, गोंदिया. |
| १०. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), चंद्रपूर. | - | चंद्रपूर. |
| ११. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), गडचिरोली. | - | गडचिरोली. |

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.04.01 15:32:59 +05'30'

( डी. एल. थोरात )
सह सचिव (वने)

**परिशिष्ट-ब**

| अ. क्र. | उपसंचालक, सामाजिक वनीकरण कार्यालय [नवीन पदनाम विभागीय वन अधिकारी (सामाजिक वनीकरण)] | नियंत्रक कार्यालय |
|---|---|---|
| १ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, पुणे. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), पुणे. |
| २ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, सोलापूर. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), पुणे. |
| ३ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, सातारा. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर. |
| ४ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, सांगली. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर. |
| ५ | उप संचालक, सामाजिक वनीकरण,रत्नागिरी. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर. |
| ६ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, सिंधुदुर्ग. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर. |
| ७ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, कोल्हापूर. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर. |
| ८ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, ठाणे. (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हे) | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे. |
| ९ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, रायगङ. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे. |
| १० | उप संचालक, सामाजिक वनीकरण, पालघर. (अति. कार्यभार ठाणे) | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे. |
| ११ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, नाशिक. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नाशिक. |
| १२ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, अहमदनगर. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नाशिक. |
| १३ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, धुळे. | मुख्य वनसंरक्षक (प्रा), धुळे. |
| १४ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, जळगाव. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), धुळे. |
| १५ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, नंदुरबार. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), धुळे. |
| १६ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, औरंगाबाद. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), औरंगाबाद. |
| १७ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, जालना. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), औरंगाबाद. |
| १८ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, बीङ | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), औरंगाबाद. |
| १९ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, उस्मानाबाद. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), औरंगाबाद. |
| २० | उप संचालक, सामाजिक वनीकरण, लातूर. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), औरंगाबाद. |
| २१ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, परभणी. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), औरंगाबाद. |
| २२ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, नांदेङ. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), औरंगाबाद. |

| | | |
|---|---|---|
| २३ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, हिंगाली. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), औरंगाबाद. |
| २४ | उप संचालक, सामाजिक वनीकरण,अमरावती. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), अमरावती. |
| २५ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, बुलढाणा. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), अमरावती. |
| २६ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, अकोला. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), यवतमाळ. |
| २७ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, वाशिम. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), यवतमाळ. |
| २८ | उप संचालक, सामाजिक वनीकरण,यवतमाळ. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), यवतमाळ. |
| २९ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, नागपूर. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर. |
| ३० | उप संचालक, सामाजिक वनीकरण, भंडारा. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर. |
| ३१ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, गोंदिया. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर. |
| ३२ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, वर्धा. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर. |
| ३३ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, चंद्रपूर. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), चंद्रपूर. |
| ३४ | उप संचालक, सामाजिक वनीकरण, गडचिरोली. | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), गडचिरोली. |

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.04.01 15:36:29 +05'30'

( डी. एल. थोरात )
सह सचिव (वने)